**दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीस अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत सुधारीत योजना - शुध्दीपत्रक.**

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः क्र.मचिअ-२०१२/ प्र.क्र.१४१ / सां.का.१**

मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: २८ ऑगस्ट २०१४

**वाचा -**

**शासन निर्णय क्रमांकः** पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक : मचिअ २०१२/ प्र.क्र.१४१/सां.का.१, दि. ३० ऑक्टोबर २०१३.

**प्रस्तावना -**

शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.मचिअ-२०१२/प्र.क्र. १४१/सांका-१, दिनांक ३० ऑक्टोबर २०१३ अन्वये दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीसाठी अर्थसहाय्य देण्याची सुधारित योजना कार्यान्वित करण्यात आली. या शासन निर्णयाच्या प्रभावी व सुटसुटीत अंमलबजावणीसाठी यातील काही भागात सुधारणा करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक -**

दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीस प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय्य मंजुर करण्याबाबतच्या सध्याच्या योजनेत सुधारणा करण्यासंदर्भात प्राप्त झालेल्या सर्व सूचनांचा साकल्याने विचार केल्यानंतर शासनाने खालीलप्रमाणे दुरुस्त्या करण्याचा निर्णय घेतला आहे :-

१) शासन निर्णयातील अ.क्र. ३ - या योजनेचा लाभ घेण्यास महाराष्ट्र राज्यात कायमचे वास्तव्य (Domicile Certificate) या ठिकाणी महाराष्ट्र राज्यात "कायमचे वास्तव्य (Domicile Certificate)" हे शब्द वगळण्यात यावेत. त्याऐवजी फक्त "महाराष्ट्र राज्यात वास्तव्य" असे वाचावे.

२) अ) शासन निर्णयातील अ.क्र. ६ मध्ये महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळाने विहित नमुन्यात प्राप्त झालेले अर्ज, चित्रपटाची कथा, पटकथा, संवादाची (मोठ्या अक्षरात टंकलिखित करुन) प्रत, चित्रपटाची रिळ / व्हीसीडीज् / डिव्हीडीज्, चित्रपट प्रदर्शित केल्याबाबतची कागदपत्रे आणि.......... या ऐवजी "चित्रपट कथा, पटकथा, संवादाची प्रत आणि रिळे डिव्हीडीज/ डिसीपी (डिजीटल सिनेमा पॅकेज)" असे वाचावे.

ब) परिशिष्ट- अ मधील परिच्छेद १० मध्ये चित्रपटाची कथा, पटकथा, संवादाची (मोठ्या अक्षरात टंकलिखित करुन) प्रत, चित्रपटाची रिळे, व्हीसीडीज / डिव्हीडीज, चित्रपट प्रदर्शित केल्याबाबतची कागदपत्रे आणि...... या ऐवजी यात "डिव्हीडीज नंतर डिसीपी (डिजीटल सिनेमा पॅकेज)" असे वाचावे.

३) प्रस्तुत शासन निर्णयातील परिशिष्ट "ब" मधील परिच्छेद ३ मध्ये "परिक्षण करणाऱ्या प्रत्येक सदस्याने महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ विहित करेल त्या प्रपत्रात चित्रपटाच्या प्रत्येक बाबीबाबत एका परिच्छेदामध्ये आपले निरीक्षण व मत नोंदवावे व त्या आधारे गुण द्यावेत." या ऐवजी या ठिकाणी "परिक्षण करणाऱ्या प्रत्येक सदस्याने फक्त गुण द्यावेत. आपले मत नोंदवू नये." असे वाचावे.

४) प्रस्तुत शासन निर्णयातील परिशिष्ठ "क" मध्ये मराठी चित्रपट निर्मात्यांनी अनुदानाकरिता करावयाच्या विहित नमुन्यातील अर्ज यामधील परि. १०-अ मध्ये डिजिटल सराऊंड साऊंड (डॉल्बी / डि.टी.एस.इ.) चा वापर केला आहे का ? या ऐवजी "डिजिटल सराऊंड साऊंड (डॉल्बी / डि.टी.एस. ५.१ स्टिरिओ किंवा ७.१ स्टिरिओ साऊंड) चा वापर केला आहे का ?" असे वाचावे.

५) या शासन निर्णयातील परिशिष्ट "क" चे प्रपत्र अर्जासोबत सादर करावायच्या कागदपत्रांची/ प्रमाणपत्रांची यादी यामधील महाराष्ट्र राज्याचा रहिवासी असल्याचा पूरावा (Domicile Certificate) यामधील "(Domicile Certificate)" हा शब्द वगळण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१११११२०१४७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Pandurang Bhokare

Digitally signed by Sanjay Pandurang Bhokare
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Sanjay Pandurang Bhokare
Date: 2014.09.11 13:27:17 +05'30'

**( संजय पां. भोकरे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव.
४) मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव.
५) मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव.
६) मा. विधान मंडळ सदस्य - सर्व.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) एक, महाराष्ट्र, मुंबई.
८) महालेखापाल (लेखा परीक्षा) एक, महाराष्ट्र, मुंबई.
९) महालेखापाल (लेखा परीक्षा) तीन, महाराष्ट्र, मुंबई.
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२) सर्व विभागीय आयुक्त.
१३) सर्व जिल्हाधिकारी.
१४) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१७) संचालक, सांस्कृतिक कार्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव (पूर्व), मुंबई - ४०० ०६५.
१९) व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर.
२०) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई.
२१) अध्यक्ष, अखिल भारतीय मराठी चित्रपट महामंडळ, रवींद्र नाटयमंदिर, प्रभादेवी, मुंबई.
२२) निवड नस्ती, का. सां.का.-१.